**मेहकर, जिल्हा बुलढाणा येथील दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर मेहकर यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत .**

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः डीडीओ २०१९/प्र.क्र.४०/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १४ फेब्रुवारी, २०१९

**वाचा -**

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः सीसीबी १६९८/प्र.क्र.१४१/का.१२, दिनांक ४ ऑक्टोबर, २०१८

२ शासन अधिसूचना विधि व न्याय क्रमांकः सीआरसी २०१८/प्र.क्र.२२०/का.बारा, दिनांक २४ जानेवारी, २०१९

३ प्रबंधक (निरीक्षणे १), मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक B(W)A-१२१५ of १९८१, ४५०/५७४२/२०१९, दिनांक १३.०२.२०१९

**प्रस्तावना -**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मेहकर, जिल्हा बुलढाणा येथे दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर या जोड न्यायालयाऐवजी नियमित स्वरुपात दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर न्यायालय स्थापन करण्यास व या न्यायालयासाठी पद निर्मिती करण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन अ.क्र. २ येथील शासन अधिसूचना दिनांक २४ जानेवारी, २०१९ अन्वये दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर मेहकर, जिल्हा बुलढाणा यांचे न्यायालय दिनांक १ फेब्रुवारी, २०१९ पासून कार्यान्वित झाले आहे. यास्तव, संदर्भाधीन दिनांक १३ फेब्रुवारी, २०१९ रोजीच्या पत्रान्वये प्रबंधक, निरीक्षणे (१), मा.उच्च न्यायालय मुंबई यांनी केलेल्या विनंतीस अनुलक्षून दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर मेहकर, जिल्हा बुलढाणा यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

मेहकर, जिल्हा बुलढाणा येथे स्थापन करण्यात आलेल्या दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर या न्यायालयासाठी महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम क्रमांक १५(३) व १५६ अन्वये दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर मेहकर, जिल्हा बुलढाणा यांना "कार्यालय प्रमुख" तसेच, “आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तिय बाबींपुरतेच मर्यादीत राहतील.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग २, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ च्या भाग पहिला, उप विभाग एक, अनुक्रमांक तीन येथे नमूद नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यास आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे..

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१४१३१२५७९४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagyashree Rajendra Bhaidkar

Digitally signed by Bhagyashree Rajendra Bhaidkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=Bhagyashree Rajendra Bhaidkar
Date: 2019.02.14 13:15:10 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रबंधक (निरीक्षणे-१/२), उच्च न्यायालय अपील शाखा, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालय बुलढाणा,
३. जिल्हा न्यायाधिश १ तथा अतिरिक्त सत्र न्यायाधिश, मेहकर, जिल्हा बुलढाणा
४. दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर मेहकर, जिल्हा बुलढाणा
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी बुलढाणा,
७. उप कोषागार अधिकारी, मेहकर, जिल्हा बुलढाणा,
८. कक्ष अधिकारी (व्यय-५ / आ.पु.क.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कक्ष अधिकारी का.७/२३/२४/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती (का.१२)